**नविन प्रशासन भवन इमारतीमधील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या ताब्यातील जागा आंतरबदलाने महिला व बाल विकास विभागास वाटप करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय, क्र.शाकाजा-११२१/प्र.क्र.६७/२०२१/२२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २४ डिसेंबर, २०२१

**<u>प्रस्तावना :-</u>**

महिला व बाल विकास विभाग आणि पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग या दोन्ही विभागाच्या संगनमताने नवीन प्रशासकीय भवन, ३ रा मजला (पुर्व बाजू) येथील पाणी पुरवठा विभागाची १८७३ चौ.फूट जागा गो.ते. रुग्णालयातील ७ व्या मजल्यावरील २००० चौ.फूट जागेत कार्यरत असलेल्या महिला व बाल विकास विभागाच्या अखत्यारीतील राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य आणि पोषण अभियान यांच्या कार्यालयासाठी व गो.ते. रुग्णालयातील ७ व्या मजल्यावरील महिला व बाल विकास विभागाच्या अखत्यारीतील राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य आणि पोषण अभियान यांच्या कार्यालयाची २००० चौ.फूट जागा पाणी पुरवठा विभागास आंतरबदलाने (Interchange) वाटप करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

नवीन प्रशासकीय भवन, ३ रा मजला (पुर्व बाजू) येथील पाणी पुरवठा विभागाची १८७३ चौ.फूट जागा गोकुळदास तेजपाल रुग्णालयातील ७ व्या मजल्यावरील २००० चौ.फूट जागेत कार्यरत असलेल्या महिला व बाल विकास विभागाच्या अखत्यारीतील राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य आणि पोषण अभियान यांच्या कार्यालयासाठी वाटप करण्यात येत आहे.

२. गोकुळदास तेजपाल रुग्णालयातील ७ व्या मजल्यावरील महिला व बाल विकास विभागाच्या अखत्यारीतील राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य आणि पोषण अभियान यांच्या कार्यालयाची २००० चौ.फूट जागा पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास वाटप करण्यात येत आहे.

३. तसेच, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने तात्पुरत्या स्वरुपात वाटप केलेल्या नविन प्रशासन भवन, ९ वा मजला, पूर्व बाजू येथील जागेत कार्यरत कार्यासनातील अधिकारी/कर्मचारी यांना गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारतीमध्ये नव्याने वाटप केलेल्या जागेत स्थलांतरीत करुन ९ वा मजला, पूर्व बाजू येथील जागा रिक्त करावी.

३. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांनी उपरोक्त जागेचा ताबा संबंधितांना दयावा. तसेच, नविन प्रशासन भवन, ९ वा मजला, पूर्व बाजू येथील जागेचा ताबा पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून घ्यावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२४१७४५०८४१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUVARNA
GANESH GAWDE

Digitally signed by SUVARNA GANESH GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ef7c7aa7d7ef166d903fa3f2e19630176b5aef86edf82a7744d898d274681eeb, pseudonym=EFFC2A085C4346EF93DD68333741DFA82FED5991, serialNumber=07C579538500B8975CCC3AD7E231B775BF3CCCF9649AB7E299CD82DCBE6A25C8, cn=SUVARNA GANESH GAWDE
Date: 2021.12.24 17:47:09 +05'30'

**( सु. ग. गावडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य
२. मा.सभापतींचे सचिव/मा.अध्यक्षांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
८. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, मुंबई-०१.
१०. उप सचिव (का.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, २ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-०१.
१४. उप अभियंता, दक्षिण उपविभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, एम.टी.डी.सी.समोर, मुंबई.
१५. शाखा अभियंता, सा.बां. विभाग, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत आवार, मुंबई-०१.
१६. शाखा अभियंता, मंत्रालय शाखा (स्थापत्य), सा.बां. मंत्रालय आवार, मंत्रालय, मुंबई-३२
१७. शाखा अभियंता (सा.बां.) बंगलो, नविन प्रशासन भवन, तळमजला, मंत्रालय, मुंबई-३२
१८. निवडनस्ती.